केंद्र शासनाकडून मंजूर करण्यात आलेले रु. ६ लक्ष इतका निधी सन २००९-१० या वर्षात नागपूर येथे दिनांक १२ ते १४ मार्च, २०१० कालावधीत आदिवासी महोत्सवाकरिता खर्च करण्यास मान्यता देणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्र. आविवि २००९/ प्रक्र.२७४/ का-५

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २ फेब्रुवारी, २०१०

**वाचा :** जनजाती मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र. १५०१८/२०(iv)/२००९-R&M, दिनांक ३१.१२.२००९

**शासन निर्णय :** केंद्रशासनाकडून राज्यामध्ये ३ दिवसांचे आदिवासी महोत्सवाचे आयोजन करण्याकरीता आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना रु. ६,०००००/- (अक्षरी रु. सहा लक्ष फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. नागपूर येथे दिनांक १२ ते १४ मार्च, २०१० या ३ दिवसांच्या कालावधीकरीता सदर आदिवासी महोत्सव आयोजित करण्यास आयुक्त, आदिवासी व संशोधन प्रशिक्षण संस्था, पुणे यांना परवानगी देण्यात येत आहे.

३. रु. ६,०००००/- (अक्षरी रुपये सहा लक्ष फक्त) इतका मंजूर केलेला अनावर्ती निधी केंद्रशासनाने त्यांच्या दिनांक ३१.१२.२००९ च्या पत्रान्वये विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना तसेच अटी व शर्तीच्या अधिन राहून खर्च करण्यास शासन मान्यता देत आहे.

४. केंद्रशासनाने मंजूर केलेला सदर अनावर्ती खर्च सन २००९-१० या आर्थिक वर्षात खर्च करण्यास आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१००३०२१९५३१७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे नांवाने व आदेशानुसार

(पि.रा. भोसले)
कार्यासन अधिकारी

प्रत :

आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती का-५

C:\Documents and Settings\pgsu0210\My Documents\ForestACt-5GovtRes.lwp